राज्य उत्पादन शुल्क विभागातील उप अधीक्षक (गट-ब) संवर्गातील अधिकाऱ्यांना अधीक्षक (गट-अ) या संवर्गात देण्यात येणाऱ्या पदोन्नतीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्रमांक:- इएसटी-१७१७/प्र.क्र.३८/राउशु-१,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २८ सप्टेंबर, २०१८.

**शासन आदेश -**

राज्य उत्पादन शुल्क विभागातील उप अधीक्षक (गट-ब) या संवर्गातून अधीक्षक (गट-अ) या संवर्गात पदोन्नती देण्यासाठी तयार करण्यात आलेल्या सन २०१७-१८ च्या पदोन्नतीसूचीमधील खालील अधिकाऱ्यांना अधीक्षक (गट-अ) या संवर्गात खुल्या प्रवर्गातून पदोन्नती देण्यात येत असून, सदर पदोन्नतीनंतर, त्यांची त्यांच्या नावासमोर (स्तंभ ४ येथे) दर्शविण्यात आलेल्या महसूली विभागामध्ये (स्तंभ ५ येथे) दर्शविण्यात आलेल्या रिक्त ठिकाणी पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | मूळ प्रवर्ग | वाटप करण्यात आलेला महसूली संवर्ग | पदोन्नतीनंतर देण्यात येणारी पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री. जी.व्ही.बारगजे | भज-ड | औरंगाबाद | अधीक्षक, लातूर |
| २ | श्री. पी.एस.तांबे | खुला | नागपूर | अधीक्षक, गोंदिया |

२. सदर पदोन्नती ही, निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात, सेवाज्येष्ठतेनुसार खुल्या प्रवर्गातील पदांवर मा.सर्वोच्च न्यायालयातील विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ मधील निर्णयाच्या अधीन राहून देण्यात येत आहे. याशिवाय सदर तदर्थ पदोन्नती ही खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे:-

अ) सदर तदर्थ पदोन्नती अकरा महिने किंवा महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून शिफारस केलेले उमेदवारांची नियुक्ती होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तेवढया कालावधीकरीता असेल.

ब) सदर तात्पुरत्या स्वरूपातील पदोन्नतीमुळे संबंधित अधिकाऱ्यास नियमित पदोन्नतीचे, ज्येष्ठतेचे किंवा अन्य कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

क) सदर पदोन्नत्या तदर्थ स्वरूपाच्या असून या पदोन्नत्या केवळ पदोन्नत कोट्यात उपलब्ध होणाऱ्या पदांनुसार नियमित करण्यात येतील.

३. संबंधित उप अधीक्षक यांनी अधीक्षक पदाची तदर्थ पदोन्नती न स्वीकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक-एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का-१२, दिनांक १२.९.२०१६ अन्वये त्यांचे नाव सन २०१७-१८ च्या निवडसुचीतून काढून टाकण्यात येतील व पुढील दोन वर्षी होणाऱ्या निवडसुच्यांमध्ये त्यांच्या नावाचा विचार न करता तिसऱ्या वर्षाच्या निवडसुचीत अधीक्षक पदावरील पदोन्नतीसाठीची पात्रता तपासण्यात येईल.

४. सदर अधिकाऱ्यांनी पदोन्नतीचा स्वीकार करून, पदस्थापनेच्या पदावर तात्काळ रूजू व्हावे. संबंधित अधिकाऱ्यांना उपरोक्त पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत आयुक्त, राउशु यांनी शासनास त्वरीत कळवावे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८०९२८१३२०११६६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shivaji Baburao Chavan

Digitally signed by Shivaji Baburao Chavan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9aa522e32450ec03b47343bc963097b0e134f043fb205f2e97595f145aaf4d73, serialNumber=b5ccfce8750c2a4b31ad76a42c0094dcbcc63834c3279619496c6858859c8594, cn=Shivaji Baburao Chavan
Date: 2018.09.28 13:45:50 +05'30'

**( शिवाजी बा.चव्हाण )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. मंत्री (राउशु) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई .
३) महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई व नागपूर.
४) सर्व विभागीय उप आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, लातूर, गोंदिया.
६) संबंधित अधिकारी.
७) कक्ष अधिकरी, राउशु-२/राउशु-३, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) निवडनस्ती-(राउशु-१).